**अर्थसंकल्पिय अनुदान सन २००९-२०१०**
**मागणी क्र.वाय-२,२२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता अंतर्गत लेखाशीर्ष २२१५२०१७ खालील तरतूदीचे लेखाशीर्ष २२१५२०८२ कडे पुनर्विनियोजन करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय, क्र पुनर्वि- २००९/प्र.क्र. ६५ /पापु-०४ ,
मंत्रालय, मुंबई -४०००३२
दिनांक- ९ मार्च २०१०

**पहा-** १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अंदाज-१००९/प्र.क्र.९०/२००९/अर्थसंकल्प-३, दिनांक ३१ मार्च, २००९.
२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक पूरक-१०.९/प्र.क्र.१५२/अर्थसंकल्प-३ दिनांक ३० जून २००९

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.१ अन्वये आर्थिक वर्ष २००९-१० साठीचा महाराष्ट्र (लेखानुदान) विनियोजन अधिनियम, २००९ क्रमांक ९ म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण , भाग-४, दिनांक २३ मार्च,२००९ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे. तर, संदर्भ क्र.२ अन्वये पुरवणी विनियोजन अधिनियम,२००९ (सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४ दिनांक २० जून,२००९ यामध्ये प्रसिध्द करण्यात आला आहे.

त्यानुसार सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी राज्य योजनांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत उपअभियान कार्यक्रमासाठी "मागणी क्रमांक वाय-२,२२१५ -पाणी पुरवठा व स्वच्छता-१०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम- राष्ट्रीय तंत्रविज्ञान कार्यक्रम, उप अभियान कार्यक्रम (०४)(०६)पाणी पुरवठा योजनांच्या उद्भवांचे बळकटीकरण इत्यादी उपाययोजनांची अंमलबजावणी (राज्यहिस्सा) (२२१५-२०१७)" या लेखाशीर्षाखाली एकूण रु.११३१.८७ लक्ष इतका नियमव्यय मंजूर आहे. तथापि, उपअभियान कार्यक्रमासाठी राष्ट्रीय ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत (NRDWP ) केंद्र शासनाकडून पुरेसा निधी उपलब्ध झाल्याने, चालू आर्थिक वर्षात (२००९-१०)उप अभियान कार्यक्रमासाठी उपलब्ध झालेला रु.११३१.८७ लक्ष निधी राज्य योजनांतर्गत देखभाल दुरुस्ती कार्यक्रमासाठी(लेखाशीर्ष २२१५२०८२) पुर्नविनियोजनाद्धारे उपलब्ध करुन देण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय: -**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, चालू आर्थिक वर्षात (२००९-१०)उप अभियान कार्यक्रमासाठी उपलब्ध झालेला रु.११३१.८७ लक्ष निधी राज्य योजनांतर्गत देखभाल दुरुस्ती

कार्यक्रमासाठी(लेखाशीर्ष २२१५२०८२) पुर्नविनियोजनाद्धारे पुढीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

**(रुपये लाखात)**

| **अ.क्र** | **लेखाशीर्ष** | **सन २००९-१० करीता मंजूर तरतूद** | **पुर्नविनियोजित करावयाची तरतूद** | **पुर्नविनियोजनाद्वारे उपलब्ध तरतूद** |
|---|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक वाय-२,२२१५ -पाणी पुरवठा व स्वच्छता-१०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-राष्ट्रीय तंत्रविज्ञान कार्यक्रम, उप अभियान कार्यक्रम (०४)(०६)पाणी पुरवठा योजनांच्या उद्भवांचे बळकटीकरण इत्यादी उपाययोजनांची अंमलबजावणी (राज्यहिस्सा) (२२१५-२०१७) | ११३१.८७ | (-) ११३१.८७ | ०.०० |
| २. | मागणी क्रमांक वाय-२,२२१५ -पाणी पुरवठा व स्वच्छता-१०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (०२)(१६)नळाद्धारे पाणी पुरवठा योजना-देखभाल व दुरुस्ती यासाठी अनुदान (२२१५-२०८२) | ३३९५.६२ | (+) ११३१.८७ | ४५२७.२९ |

२. वित्त विभाग, शासन निर्णय, विअप्र-१०.०८/प्र.क्र. ७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे,२००९ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-एक मधील उपविभाग तीन अनुक्रमांक १ महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका परिच्छेद १६२ ,१६३, व १६४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच नियोजन विभागाचा अनौ.सं.क्र.१७/१४४३ दि.१२/१/२०१० व वित्त विभागाचा अनौ.सं.क्र. ६४/१०/व्यय-३ दि.५/२/२०१० अन्वये मिळालेल्या सहमती नुसार सदर आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra. gov.in** या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००३१०१८२२४८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही/-**

**(उ.म.मदन )**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

प्रत:

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/२ नागपूर (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता)
२. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
३. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई
४. उप लेखापरिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक,पुणे,अमरावती,औरंगाबाद व नागपूर
५. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
६. सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
७. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
८. वित्त विभाग(व्यय-३), मंत्रालय, मुंबई
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कक्ष अधिकारी/ लेखा अधिकारी, पापु ०५, पापु-०७, पापु-१५, पापु-२०
११. निवडनस्ती (पापु-०४)